राज्य कामगार विमा योजने अंतर्गत आयुक्त, राज्य कामगार विमा योजना, मुंबई यांच्या नियंत्रणाखालील १२ रुग्णालयांच्या आस्थापनेवरील मंजूर असलेली एकूण-११३५ अस्थायी पदे दि.०१.१०.२०१९ ते दि.२९.०२.२०२० पर्यंत पुढे सुरु ठेवण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
**शासन निर्णय क्रमांक : राकायो-२०१९/प्र.क्र.२२४/ राकावि-२,**

गोकुळदास तेजपाल रूग्णालय आवार, १० वा मजला,
मंत्रालय, मुंबई -४०० ००१
दिनांक : १९ ऑक्टोबर, २०१९.

**वाचा -**

1. **शासन निर्णय क्रमांकः वित्त विभाग क्र.असंक-१००४/प्र.क्र.१२ (भाग-२)/२००४/वित्तीय सुधारणा-१, दि.०४ ऑक्टोबर, २००४.**
2. **शासन निर्णय क्रमांकः शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक राकायो-१५०२ / प्र.क्र.२ २००२/ राकावि-२, दिनांक ०१.१०.२००७.**
3. **शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्रमांक राकायो-२०१९/प्र.क्र.८३/राकावि-२, दि.२५.०३.२०१९.**
4. **शासन निर्णय वित्त विभाग पदनि-२०१६/प्र.क्र.०८/१६/आ.पु.क., दि.११.०९.२०१९.**
5. **आयुक्त राज्य कामगार विमा योजना, मुंबई यांचे पत्र क्र.आयुक्त/राकावियो/अस्थायी पदे पुढे चालू ठेवणे/का.क्र.३/१४३७६/२०१९, दि.१७.१०.२०१९.**

**प्रस्तावना -**

संदर्भांकित अ. क्र. २ येथील शासन निणर्यामधील आदेशान्वये राज्य कामगार विमा योजने अंतर्गत पदांच्या सुधारीत आकृतीबंधास मंजूरी देण्यात आलेली असून त्यानुसार आयुक्त, राज्य कामगार विमा योजना, मुंबई यांच्या नियंत्रणाखालील कार्यरत असलेल्या १२ रुग्णालयांच्या आस्थापनेवरील ११३५ अस्थायी पदांना संदर्भांकित अ.क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये दि.१.०३.२०१९ ते दि.३०.०९.२०१९ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मुदतवाढ देण्यात आलेली आहे. सदरील सर्व ११३५ अस्थायी पदे दि.०१.१०.२०१९ ते दि.२९.०२.२०२० पर्यंतच्या कालावधीसाठी पुढे सुरु ठेवण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

उपरोक्त प्रस्तावनेत नमूद केल्याप्रमाणे आयुक्त, राज्य कामगार विमा योजना, मुंबई यांच्या नियंत्रणाखालील कार्यरत असलेल्या पुढे दर्शविण्यात आल्याप्रमाणे १२ रुग्णालयाच्या, रुग्णालय निहाय

आस्थापनेवरील मंजूर असलेल्या एकूण ११३५ अस्थायी पदांना दि.०१.१०.२०१९ ते दि.२९.०२.२०२० पर्यंतच्या कालावधीसाठी पुढे सुरु ठेवण्यास या शासन निर्णयाव्दारे मंजुरी देण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **रा.का.वि.योजनेचे रुग्णालय** | **अस्थायी पदे** |
|---|---|---|
| १ | वरळी | २९ |
| २ | अंधेरी | ५१ |
| ३ | कांदिवली | ७० |
| ४ | मुलुंड | ५९ |
| ५ | ठाणे | ५७ |
| ६ | वाशी | २५ |
| ७ | उल्हासनगर | ७२ |
| ८ | औंध पुणे | ३१ |
| ९ | नाशिक | १९० |
| १० | सोलापूर | २४४ |
| ११ | नागपूर | ८४ |
| १२ | औरंगाबाद | २२३ |
| | **एकूण पदे** | **११३५** |

२. उपरोक्त सर्व पदावरील खर्च पुढे नमूद केलेल्या लेखाशिर्षाखाली करण्यात यावा तसेच सन २०१९-२०२० या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक आर-१
सार्वजनिक आरोग्य विभाग
२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
०१ - नागरी आरोग्य सेवा - विषम चिकित्सा
१०२ - राज्य कामगार विमा योजना
१०२-१- बृहन्मुंबईतील व मुफसल क्षेत्रातील राज्य कामगार विमा योजना
(०१)(०३)- रा.का.वि.योजना, रुग्णालये
(२२१० १४०२) योजनेत्तर,

३. सदर खर्च राज्य शासन व राज्य कामगार विमा महामंडळ, नवी दिल्ली यांच्यात १:७ या प्रमाणात विभागण्यात यावा. तसेच सदरहू खर्चाची प्रतिपूर्ती वेळीच राज्य कामगार विमा महामंडळाकडून मिळवून घेण्याची आयुक्तांनी दक्षता घ्यावी.

४. मंजुर पदांचा आढावा घेऊन सुधारीत आकृतीबंधस उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेण्यासाठी आयुक्त, राकावियो कार्यालयाने प्रस्ताव सादर करणे आवश्यक आहे.

हा शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक ११.०९.२०१९ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१०१८१७५९०४४०१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Govind Changoji Bhise

Digitally signed by Govind Changoji Bhise
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=PHD Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e9596d652d5b6cb0f88e4c39c6c2adf97629debbf12176865f2683a6eb9318e8, cn=Govind Changoji Bhise
Date: 2019.10.19 12:48:46 +05'30'

( डॉ.गोविंद भिसे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,
१. आयुक्त, राज्य कामगार विमा योजना, मुंबई.
२. संचालक (प्रशासन/वैद्यकीय), राज्य कामगार विमा योजना, मुंबई.
३. वैद्यकीय अधीक्षक, राज्य कामगार विमा योजना रुग्णालय, वरळी/अंधेरी/कांदिवली/ मुलुंड/ठाणे/वाशी/उल्हासनगर/औंध पुणे/नाशिक/सोलापूर/नागपूर/औरंगाबाद.
४. महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परीक्षा) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई .
७. जिल्हा कोषागार अधिकारी ठाणे/पुणे/नाशिक/सोलापूर/नागपूर/औरंगाबाद.
८. उप जिल्हा कोषागार अधिकारी, उल्हासनगर/कोकण भवन, नवी मुंबई.
९. वैद्यकीय आयुक्त, राज्य कामगार विमा महामंडळ, पंचदीप भवन, कोटला रोड, नवी दिल्ली.
१०.प्रादेशिक संचालक, राज्य कामगार विमा महामंडळ, पंचदिप भवन, ना.म.जोशी मार्ग, लोअर परेल, मुंबई-१३.
११.वित्त विभाग व्यय -१३, मंत्रालय, मुंबई.
१२.अवर सचिव (अर्थसंकल्प/सेवा-१), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३.निवडनस्ती (राकावि-२).